**तात्काळ**

**राज्यातील शासकीय/ जिल्हा परिषद/ पंचायत समित्या मधील वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे पुढील आदेशापर्यन्त भरण्यास स्थगिती.**

**मागासवर्गीयांची पदे भरण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रकं क्र.एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/२००३/१२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २ डिसेंबर,२००३

वाचा:-१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र : एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/२००३/१२, दि. १० मार्च, २००३

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र : एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/२००३/१२, दि.१ ऑगस्ट, २००३

३) महाराष्ट्र शासन,नियोजन विभाग पत्र क्र.आस्थाप-११०३/प्र.क्र.४५/रोहयो-३, दिनांक ७ जुलै,२००३.

४) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र,बीसीसी-२००२/१३०६/१६-ब, दिनांक ७ ऑक्टोबर,२००३

५) शासन परिपत्रक ,सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/२००३/१२ दिनांक ३० ऑक्टोबर,२००३

**परिपत्रक**

संदर्भाधीन क्रमांक २ व ५ येथील अनुक्रमे दिनांक १ ऑगस्ट,२००३ तसेच दिनांक ३० ऑक्टोबर,२००३ च्या परिपत्रकान्वये मा. उच्च न्यायालय,औरंगाबाद खंडपीठाने दिलेल्या अनुमतीनुसार असे निदेश देण्यात आले होते की वर्ग-३ व वर्ग-४ मधील मागासवर्गीयांसाठी आरक्षित असलेल्या पदांवर हजेरी सहाय्यकातील मागासवर्गीय उमेदवार सामावून घेतल्यानंतर उर्वरीत मागासवर्गीय पदांवर अनुकंपा, स्वातंत्र्य सैनिकांचे पाल्य, प्रकल्पग्रस्त, अंशकालीन कर्मचारी आणि जनगणना कर्मचारी यांच्या सूचीतील मागासवर्गीय उमेदवारांची नियुक्ती प्राधान्याने करावी.

२. मा.उच्च न्यायालय,औरंगाबाद खंडपीठाने निदेशित केलेल्या वरील क्रमवारीनुसार मागासवर्गीय उमेदवारांना नियुक्ती दिल्यानंतर देखील जर मागासवर्गीयांची आणखी काही पदे/अनुशेष शिल्लक राहिला तर ती पदे कशाप्रकारे भरावीत याबाबत विविक्षित निदेश नव्हते. त्याबाबत आता असे स्पष्ट करण्यात येते की वरील परिच्छेदात नमूद केलेल्या प्रवर्गातून मागासवर्गीय उमेदवारांची भरती केल्यानंतरही मागासवर्गीयांची काही पदे/अनुशेष शिल्लक राहात असल्यास त्या पदांवर प्रचलित कार्यपध्दतीचे पालन करुन विहित मार्गांनी उर्वरीत पदे पात्र अशा मागासवर्गीय उमेदवारांच्या निवडीने भरता येतील.

३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:बीसीसी-२००२/१३०६/१६-ब,दिनांक ७ ऑक्टोबर,२००३ अन्वये अनुशेषाची पदे भरण्यास ३१ डिसेंबर,२००३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली असल्याने या कालावधीत वरीलप्रमाणे कार्यवाही करुन अनुशेषाची सर्व पदे भरुन काढण्याची सर्व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

प्रकाश लोखंडे
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,/
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
सर्व मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग/का.१३-अ,
नियोजन विभाग-कार्या-रोहयो-३,
वित्त विभाग/वित्तिय सुधारणा,
*प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय (विधानसभा)मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधानपरिषद) मुंबई,
*राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन ,मुंबई,
*महालेखपाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई,
*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र,नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती

* पत्राने.

---

एच-946(4,500-11-03).